अव्वल कारकून व मंडळ अधिकारी संवर्गातून नायब तहसिलदार संवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात नियमित पदोन्नती कोट्यातील रिक्त पदावर तसेच सरळसेवेच्या कोट्यातील पदांवर तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देणेबाबत (नाशिक विभाग).

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः पदोन्न -२०२४/प्र.क्र.६०/ई-९**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २४ जुलै, २०२४.

**वाचा :-**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.मशा/कार्या-१/आस्था-३/DCNSK/ १७०५१००/२०२४/२०२४, दि.१४.०३.२०२४

**शासन आदेश:-**

नाशिक विभागातील अव्वल कारकून व मंडळ अधिकारी संवर्गातील खालील तक्त्यात नमूद कर्मचाऱ्यांना नायब तहसिलदार (राजपत्रीत, गट -ब) या संवर्गात सन २०२३-२४ या निवडसूची वर्षात सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीनुसार खालीलप्रमाणे नियमित पदोन्नती कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदांवर तसेच सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदांवर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच, त्यांची नायब तहसिलदार संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्र.६ येथे नमूद पदावर परिच्छेद क्र.३ येथील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

**अ) नियमित पदोन्नती:-**

**१) अव्वल कारकून: -**

| अ.क्र | ज्येष्ठता क्रमांक | कर्मचाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग | पात्रता | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | २०७२ | श्री. डी. आर. सैदांणे | इमाव | दि.२५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (महसूल), तहसिल कार्यालय मुक्ताईनगर, जि. जळगाव |
| २ | २०८८ | श्री. जी. आर. साळी | विमाप्र | दि.२५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (संगायो), तहसिल कार्यालय रावेर, जि. जळगाव |
| ३ | २१७७ | कु. प्रतिभा एस. राजपुत | विजा अ | दि.२५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (संगायो), तहसिल कार्यालय मुक्ताईनगर, जि. जळगाव |
| ४ | २२११ | श्री. जुबेर मुनाफ पठाण | खुला | दि.२५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार, उपविभागीय अधिकारी कार्यालय तळोदा, जि. नंदुरबार |

| अ.क्र | ज्येष्ठता क्रमांक | कर्मचाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग | पात्रता | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| ५ | २२१७ | श्री. पी. एस. मराठे | खुला | दि.२५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | निवासी नायब तहसिलदार, तहसिल कार्यालय नवापुर, जि. नंदुरबार |
| ६ | २२२६ | श्री. एस. आर. तरसोदे | विमाप्र | दि.२५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय यावल, जि. जळगाव |
| ७ | २२४५ | श्री. ए. पी. सोनवणे | विमाप्र | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (संगायो), तहसिल कार्यालय चोपडा, जि. जळगाव |
| ८ | २२४६ | श्री. जे. एस. गुरव | इ मा व | दि.२५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार तदर्थ पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार, उपविभागीय अधिकारी कार्यालय फैजपूर, जि. जळगाव |
| ९ | २२४८ | श्री. संजय जी. घुले | अजाती . | दि.२५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठते नुसार तदर्थ पदोन्नतीस पात्र | निवासी नायब तहसिलदार, तहसिल कार्यालय एरंडोल, जि. जळगाव |

## २) मंडळ अधिकारी:-

| अ.क्र | ज्येष्ठता क्रमांक | कर्मचाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग | पात्रता | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ८७५ अ | श्री. व्ही. आर. धुमसे | भज (क) | दि.२५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (महसूल), तहसिल कार्यालय दिंडोरी, जि. नाशिक |
| २ | १३०९ | श्री. बी. जे. वाघमारे | इमाव | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (निवडणुक), तहसिल कार्यालय शिंदखेडा, जि. धुळे |
| ३ | १३१३ | श्री. एम. पी. जाधव | अ जा | दि.२५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (सामान्य शाखा), जिल्हाधिकारी कार्यालय धुळे, जि. धुळे |
| ४ | १३१६ | श्री. एस. डी. कानडे | इमाव | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (निवडणूक), जिल्हाधिकारी कार्यालय धुळे, जि. धुळे |
| ५ | १३१८ | श्री. ए. जी. शिंदे | विजा (अ) | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय पाथर्डी, जि. अहमदनगर |
| ६ | १३१९ | श्री. बी. बी. गोसावी | भज (ब) | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (महसूल), तहसिल कार्यालय श्रीरामपुर, जि. अहमदनगर |

| अ.क्र | ज्येष्ठता क्रमांक | कर्मचाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग | पात्रता | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| ७ | १३३६ | श्री. एस. बी. गाडे | खुला | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार तथा सहाय्यक संचालक (नगरपालिका प्रशासन), विभागीय आयुक्त कार्यालय नाशिक, जि. नाशिक |
| ८ | १३३९ | श्री. एम. एन. गाडे | खुला | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (संगायो शहर), तहसिल कार्यालय भुसावळ, जि. जळगाव |
| ९ | १३६४ | श्री.पी.एन. मेधणे | इमाव | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार तदर्थ पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (निवडणुक), तहसिल कार्यालय त्र्यंबकेश्वर, जि. नाशिक |

### (ब) सरळसेवा कोट्यातील रिक्त पदांवर तदर्थ पदोन्नती:-

### १) अव्वल कारकून:-

| अ.क्र | ज्येष्ठता क्रमांक | कर्मचाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग | पात्रता | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | २२५० | श्री. अजय प्रभाकर कुलकर्णी | खुला | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार तदर्थ पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (महसूल), तहसिल कार्यालय अमळनेर, जि. जळगाव |
| २ | २२५१ | श्री. नवीनचंद्र अशोक भावसार | इ मा व | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार नियमित पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय जळगाव, जि. जळगाव |
| ३ | २२५३ | श्रीम. अर्चना पी. पवार | भ ज (ब) | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार तदर्थ पदोन्नतीस पात्र . | नायब तहसिलदार (निवडणूक), जिल्हाधिकारी कार्यालय जळगाव, जि. जळगाव |
| ४ | २२५५ | श्री. आर. एस. मोरे | विमाप्र | दि २५/०५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार तदर्थ पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार, उपविभागीय अधिकारी कार्यालय चाळीसगाव, जि. जळगाव |
| ५ | २४०३ | श्रीम. के. टी. त्रिंबके | अ.जा. (दिव्यांग) | दिव्यांग आरक्षणानुसार तदर्थ पदोन्नतीस पात्र (गट-क, अस्थीव्यंग) | नायब तहसिलदार (महसूल), तहसिल कार्यालय जामखेड, जि. अहमदनगर |

### २) मंडळ अधिकारी :-

| अ.क्र | ज्येष्ठता क्रमांक | कर्मचाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग | पात्रता | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १३६५ | श्री.पी.ई. गोतरणे | अ.ज. | सेवाज्येष्ठतेनुसार तदर्थ पदोन्नतीस पात्र | नायब तहसिलदार (निवडणुक), ११४ वि.स.म.सं. मालेगाव, जि. नाशिक |

३. सदर नियमित पदोन्नती कोट्यातील रिक्त पदांवर तसेच सरळसेवेच्या कोट्यात तदर्थ पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार, तसेच दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून, त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून वरील कर्मचाऱ्यांना तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

२) निवडसूची तयार करताना कोणताही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाही अथवा अधिक्रमीम झालेले नाही.

३) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरती पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क असणार नाही.

४) निवडसूचीतील सर्व अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०१ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषाची पूर्तता केली आहे. या अटीच्या अधीन सदर निवडसूचीस मान्यता दर्शविण्यात येत आहे.

५) सदर निवडसुचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारलेल्या, अधिकाऱ्यांच्या पदोन्नती संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२.०९.२०१६च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याची विभागीय आयुक्त, नाशिक यांनी दक्षता घ्यावी.

६) सरळसेवा कोट्यात व प्रतिनियुक्तीमुळे रिक्त झालेल्या पदावर देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती असल्याने, ती ११ महिने किंवा म.लो.आ. कडून उमेदवार उपलब्ध होतील, किंवा प्रतिनियुक्तीवरील उमेदवार परत येतील यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत राहील.दरम्यानच्या काळात आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध झाल्यास किंवा प्रतिनियुक्तीवरील उमेदवार परत आल्यास तदर्थ पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यास पदावनत करण्यात येईल. सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधित अधिकाऱ्याचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

७) सरळसेवा कोट्यातील रिक्त झालेल्या पदावर दिलेल्या तदर्थ पदोन्नत्या, नियमित पदोन्नती कोट्यामध्ये पदांच्या उपलब्धतेनुसार समायोजित करुन नियमित निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाची व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता घेण्याची दक्षता विभागीय आयुक्त, नाशिक यांनी घ्यावी.

८) नायब तहसिलदार या संवर्गात पदोन्नती देण्यात येत असलेल्या वरील अधिकारी पदस्थापनेनंतर प्रत्यक्ष रूजू झाल्याखेरीज पदोन्नतीच्या संवर्गाच्या वेतनाचा लाभ अनुज्ञेय असणार नाहीत.

९) वरील अधिका-यांनी पदोन्नतीनंतर नायब तहसिलदार संवर्गात देण्यात आलेल्या पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू न झाल्यास संबंधित अधिकाऱ्याची पदोन्नती रद्द करण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.

१०) सदर तात्पुरत्या पदोन्नतीच्या अनुषंगाने पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यापासून संबंधित अधिकाऱ्यांची शासनाच्या पुर्व परवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करू नये.

११) तसेच भविष्यात न्यायालयीन अथवा पदोन्नतीच्या अनुषंगाने इतर काही आक्षेप निघाल्यास याची संपुर्ण जबाबदारी विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक या कार्यालयाची राहील.

४. वरील अधिका-यांनी आपल्या पदाचा कार्यभार विभागीय आयुक्त/ संबंधित कार्यालय प्रमुख यांच्या सल्ल्याने अन्य अधिका-यांकडे सुपूर्द करून पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू होणे आवश्यक आहे.

५. सदरची पदोन्नती सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या मान्यतेच्या अधीनतेने देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२४१६४०५२६५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT
MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.07.24 17:11:14 +05'30'

**( श्रीकांत म. मोहिते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
३. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
४. जिल्हाधिकारी, नाशिक, अहमदनगर, जळगाव, धुळे व नंदुरबार.
५. प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक, अहमदनगर, जळगाव, धुळे व नंदुरबार.
७. संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त नाशिक विभाग, नाशिक यांच्यामार्फत).
८. निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.